राज्य शाळा मानक प्राधिकरण (State School Standard Authority-SSSA) स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र. ३६/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८फेब्रवारी, २०२२.

<u>वाचा</u> :- १) नवीन शैक्षणिक धोरण २०२० .
२) केंद्र शासनाच्या स्टार्स प्रकल्प मान्यता मंडळाच्या दि. १५.१२.२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा यांचे दि. २५ जानेवारी, २०२२.

**परिपत्रक**

नवीन शैक्षणिक धोरण २०२० नुसार राज्य स्तरावर राज्य शाळा मानक प्राधिकरण (State School Standard Authority-SSSA) ही यंत्रणा निर्माण करणे गरजेचे आहे. या बाबींसाठी केंद्र शासनाने स्टार्स प्रकल्पांतर्गत तरतूद मंजूर केली आहे. नवीन शैक्षणिक धोरण २०२० नुसार विद्याविषयक मानके निर्धारित करण्याची कार्यवाही राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांच्या अधिकार क्षेत्रातील आहे.

राज्य शाळा मानक प्राधिकरण अशी स्वतंत्र यंत्रणा निर्माण करण्यासाठी सदर यंत्रणेची प्रशासकीय रचना, शाळांचे मानांकन करण्यासाठी निकष निश्चिती, प्राधिकरणाच्या कार्याचा तपशील, मानांकन करण्यासाठी सॉफ्टवेअर तयार करणे, सदर प्राधिकरणावर येणारा आवर्ती खर्च इत्यादी तपशील निश्चित होण्याची आवश्यकता आहे. जिल्हा परिषद, पुणे यांनी शांतीलाल मुथ्था फाऊंडेशन यांच्यासोबत अशा प्रकारचे Tool विकसित केले आहे. जिल्हा परिषद, पुणे यांचा यासंदर्भातील अनुभव व विद्याविषयक मानके निर्धारित करण्याची राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांनी करावयाची कार्यवाही यांचा विचार करता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली राज्य शाळा मानक प्राधिकरण स्थापन करण्यासाठी वरील बाबींचा समावेश करुन अहवाल सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे | अध्यक्ष |
| २ | राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक) यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ञ | सदस्य |
| ५ | समग्र शिक्षाचा प्रतिनिधी | सदस्य सचिव |

सदर समितीने आपला अहवाल एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०२२८१७४३०२५०२१ आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.02.28 17:45:21 +05'30'

**(इ.मु.काझी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
५) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
९) प्रभारी संचालक, बालभारती,
१०) निवड नस्ती (कार्या.एसडी-६)